**राज्यातील नोंदणीकृत सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या स्वयंपुनर्विकासाला चालना देण्याच्या दृष्टीकोनातून अभ्यासगट गठीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण २०२५/प्र.क्र. १८/दुवपु-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २४ एप्रिल, २०२५

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/दुवपु-१ दि.०८ मार्च, २०१९.
२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/दुवपु-१ दि.१३ सप्टेंबर,२०१९.

**प्रस्तावना :-**

राज्यातील जुन्या व जीर्ण झालेल्या शासकीय/निमशासकीय/खाजगी जमिनीवरील सर्व नोंदणीकृत सहकारी गृहनिर्माण संस्थांना त्यांच्या इमारतींचा स्वयंपुनर्विकास करण्यासाठी प्रोत्साहन देण्याकरीता द्यावयाच्या सवलतींचे प्रमाण व स्वरूप कसे असावे, याबाबत शासनास शिफारशी करण्याकरिता विभागाच्या दि. ०८ मार्च, २०१९ रोजीच्या शासन निर्णायान्वये अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण) यांच्या अध्यक्षतेखाली उच्च स्तरीय समितीची स्थापना करण्यात आली.

सदर समितीच्या शिफारशींच्या अनुषंगाने राज्यातील शासकीय/निमशासकीय/खाजगी जमिनीवरील सर्व नोंदणीकृत सहकारी गृहनिर्माण संस्थांना त्यांच्या इमारतींचा स्वयंपुनर्विकास करण्यासाठी सवलती देण्याबाबत दि.१३ सप्टेंबर, २०१९ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला.

स्वयंपुनर्विकास करण्याकरीता आवश्यक परवानगी, अर्थ व तंत्र सहाय्य सुलभ व जलदरितीने मिळाल्यास स्वयंपुनर्विकासाची प्रक्रिया जलदगतीने होणे शक्य आहे. सदर बाबी विचारात घेता, संदर्भाधीन क्र.०२ च्या शासन निर्णयातील शिफारशींच्या अनुषंगाने स्वयंपुनर्विकासास चालना मिळण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना करण्याकरीता अभ्यासगट गठीत करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील शासकीय/निमशासकीय/खाजगी जमिनीवरील सर्व नोंदणीकृत सहकारी गृहनिर्माण संस्थांना त्यांच्या इमारतींचा स्वयंपुनर्विकास करण्याकरीता प्रोत्साहन देण्याच्या दृष्टीकोनातून सवलती देण्याबाबत दि.१३ सप्टेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयातील विविध मुद्यांची पुर्तता/अंमलबजावणी प्रभावीपणे करण्याच्या दृष्टीने येणाऱ्या अडचणी व त्यावरील उपाययोजनांबाबत

शासनास शिफारशी करण्याकरीता श्री. प्रविण दरेकर, मा. विधानपरिषद सदस्य यांच्या अध्यक्षतेखाली अभ्यासगट गठीत करण्याचा निर्णय घेतला आहे.

**<u>अभ्यासगटाची रचना</u> :-**

| अ.क्र. | सदस्य | पद |
|---|---|---|
| १. | श्री.प्रविण दरेकर,मा.विधानपरिषद सदस्य | अध्यक्ष |
| २. | श्री.सदा सरवणकर, अध्यक्ष, श्री.सिध्दीविनायक मंदिर न्यास (राज्यमंत्री दर्जा) | सदस्य |
| ३. | मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ | सदस्य |
| ४. | मुख्य कार्यकारी अधिकारी,झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकारी | सदस्य |
| ५. | मुख्य अधिकारी, मुंबई इमारत व दुरुस्ती मंडळ, म्हाडा | सदस्य |
| ६. | आयुक्त,बृहन्मुंबई महानगर पालिका यांनी प्राधिकृत केलेले उपआयुक्त | सदस्य |
| ७. | आयुक्त, एम.एम.आर.डी.ए. यांनी प्राधिकृत केलेले अतिरिक्त आयुक्त, एम.एम.आर.डी.ए. | सदस्य |
| ८. | जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांनी प्राधिकृत केलेले अपर जिल्हाधिकारी/ उपजिल्हाधिकारी संवर्गातील अधिकारी | सदस्य |
| ९. | उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, सिडको यांनी प्राधिकृत केलेले व्यवस्थापक, शहर सेवा, शहर आणि औद्योगिक विकास महामंडळ (सिडको) | सदस्य |
| १०. | अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांनी प्राधिकृत केलेले सह / उप संचालक, वित्त व लेखाधिकारी संवर्गातील अधिकारी | सदस्य |
| ११. | आयुक्त, सहकार यांनी प्राधिकृत केलेले जिल्हा उप निबंधक, मुंबई शहर | सदस्य सचिव |

**<u>अभ्यासगटाची कार्यकक्षा</u> :-**

१. गृहनिर्माण विभागाच्या दि.१३ सप्टेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयातील ज्या मुद्यांबाबत संबंधित विभागाकडून कार्यवाही करण्यात आलेली नाही अशा मुद्यांबाबत कार्यवाही करण्याच्या अनुषंगाने शिफारशी करणे.

२. सदर शासन निर्णयातील कार्यवाही करण्यात आलेल्या बाबींची प्रभावी अंमलबजावणी करण्याकरीता शिफारस करणे.

३. स्वयंपुनर्विकास योजनांकरीता पुरेसे अर्थ सहाय्य उपलब्ध होण्याकरीता आवश्यक उपाययोजना सुचविणे.

४. स्वयंपुनर्विकास प्रकल्प यशस्वी होण्याकरीता कार्यपध्दती/ मार्गदर्शक सूचना तयार करणे.

५. स्वयंपुनर्विकास प्रकल्पांची व्याप्ती वाढवून ते झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, शासकीय, महानगरपालिका इ. भूखंडावरील संस्था यांचेकरीता स्वयंपुनर्विकास योजना राबविणेकरीता शिफारस करणे.

६. ज्या संस्था विकासकाविरुध्दात कायदेशीर खटल्यात गुंतल्या आहेत आणि परिणामस्वरुप पुनर्विकास कार्य अर्धवट राहिले आहेत अशा प्रकल्पांबाबत आवश्यक उपाययोजना सुचविणे.

७. जे प्रकल्प अर्धवट रखडलेले आहेत अशा प्रकल्पांचा स्वयंपुनर्विकास करता येईल का, याबाबत आवश्यक उपाययोजना सुचविणे.

८. म्हाडाच्या भुखंडावरील सहकारी गृहनिर्माण संस्थांकरीता स्वयंपुनर्विकास योजना राबविण्याकरीता शिफारस करणे.

९. संपूर्ण महाराष्ट्र राज्यात स्वयंपुनर्विकास योजनेला गती देण्याच्या अनुषंगाने आवश्यक त्या उपाययोजना सुचविणे.

१०. स्वयंपुनर्विकास योजनेतील प्रकल्पांना महारेराकडे नोंदणी करण्याबाबतच्या शिफारशी सुचविणे.

११. स्वयंपुनर्विकास करण्याकरीता आवश्यक परवानगी, अर्थ व तंत्र सहाय्य सुलभ व जलदरितीने मिळण्याच्या अनुषंगाने करावयाच्या उपाययोजना/शिफारशी.

१२. अभ्यासगटास आवश्यक वाटतील अशा स्वयंपुनर्विकास तसेच, इतर बाबींसंदर्भातील शिफारशी.

२. स्वयंपुनर्विकास प्रक्रियेची प्रभावी अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने प्रचलित कायदे/ नियम/शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेऊन आपल्या शिफारशींचा अहवाल ३ महिन्याच्या आत शासनास सादर करावा. अभ्यासगटास आवश्यतेनुसार बैठका घेता येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२४११३७४०२४०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरी करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PHIRANGE NITIN RAGHUNATH

Digitally signed by PHIRANGE NITIN RAGHUNATH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT,
2.5.4.20=edb67d4776bf9bdb10539891848bf113937cdf1adfca7bf1e9cac22215940c14, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2B60EEA8BE04A132B62B97355616E6FF0326DC7DC810ECA40666D631BE1ACA07, cn=PHIRANGE NITIN RAGHUNATH
Date: 2025.04.24 11:38:27 +05'30'

**(नितीन फिरंगे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव.

२. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे सचिव.
३. मा.उप मुख्यमंत्री (गृहनिर्माण) महोदय यांचे खाजगी सचिव.
४. मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) महोदय यांचे खाजगी सचिव.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.प्रधान सचिव (सहकार), सहकार व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, वांद्रे, मुंबई.
१३.आयुक्त, एम.एम.आर.डी.ए. वांद्रे कुर्ला कॉम्प्लेक्स, वांद्रे पूर्व, मुंबई.
१४.उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, सिडको, कोकण भवन, नवी मुंबई.
१५.सर्व विभागीय आयुक्त.
१६.सर्व आयुक्त, महानगरपालिका.
१७.सर्व जिल्हाधिकारी.
१८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१९.सर्व मुख्य अधिकारी, नगर पालिका/नगर परिषद.
२०.सर्व उप सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१.सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२.निवड नस्ती.
२३.कार्यासन-दुवपु-१, संग्रहार्थ.